जुनी मोटार-सायकल, नवीन स्कुटर किंवा
जुनी स्कुटर, नवीन मोपेड किंवा जुनी मोपेड
खरेदी साठी "शासकीय वाहनचालकांना"
अग्रिम अनुज्ञेय करण्याबाबत.

---

महाराष्ट्र शासन,
वित्त विभाग,
शासन निर्णय क्रमांक : अग्रिम-१०९९/प्र.क्र.५६/९९/विनियम,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२, दिनांक : १८ फेब्रुवारी , २०००.

पहा : शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांकः अग्रिम-१०९९/प्र.क्र.३/९९/विनियम, दि.९.७.१९९

शासकीय वाहन चालकांना त्यांच्या कार्यालयीन कामासाठी काही वेळेला पहाटे लवकर कार्यालयात यावे लागते, तसेच कामावरुन उशीरा घरी जावे लागते. अशा वेळी इतर वाहन उपलब्ध नसल्यास त्यांची गैरसोय होते. त्यामुळे मोटार सायकल खरेदी अग्रिमाकरीता असलेली रु.४६००/- ही किमान वेतनाची अट शिथील करुन सदर अग्रिम वाहन चालकांना अनुज्ञेय करण्याबाबतचा प्रश्न शासनाच्या विचाराधिन होता. वाहन चालकांची होणारी गैरसोय लक्षात घेऊन, यासंदर्भात शासनाने पुढीलप्रमाणे निर्णय घेतला आहे.

## शासन निर्णय

संदर्भाधिन दि.९.७.१९९९ च्या शासन निर्णयामधील रु.४६००/- ही मूळ वेतनाची अट "शासकीय वाहन चालकांसाठी" लागू न करता, त्याना "जुनी मोटार सायकल," नवी किंवा जुनी "स्कुटर," नवीन किंवा जुनी "मोपेड" खरेदीकरीता अग्रिम अनुज्ञेय करण्यात येत आहे. संदर्भाधिन दि.९.७.९९ च्या शासन निर्णयातील वरील प्रयोजनासाठी असलेल्या अग्रिम मर्यादा, तसेच अटी व शर्ती कायम राहतील.

हे आदेश सदर शासन निर्णय निर्गमित केल्याच्या दिनांकापासून अंमलात येतील.

मुंबई वित्तीय नियम १९५९ मधील वाहन खरेदी अग्रिम विषयक नियमांमध्ये औपचारिक सुधारणा यथावकाश करण्यात येतील.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

दे.रा. धुरी,
कार्यासन अधिकारी , वित्त विभाग

(कृ. मा. प.)

एच-1094(12500+15-2-00)

प्रति,

१. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-१, महाराष्ट्र, मुंबई ४०० ०२०.
२. महालेखापाल (लेखा परीक्षा)-१, महाराष्ट्र,मुंबई ४०० ०२०.
३. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-२, महाराष्ट्र, नागपूर.
४. महालेखापाल (लेखा परीक्षा)-२, महाराष्ट्र, नागपूर.
५. अधिदान व लेखा अधिकारी, वांद्रे(पूर्व), मुंबई ४०० ०५१,
६. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
७. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई,
८. संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई,
९. मुख्य लेखा परीक्षक, स्थानिक निधी लेखा, कोकणभवन, नवी मुंबई,
१०. राज्यपालांचे सचिव,
११. मुख्यमंत्र्यांचे सचिव,
१२. उप मुख्य मंत्र्यांचे सचिव,
१३. सर्व मंत्री व राज्यमंत्री यांचे स्वीय सहाय्यक,
* १४. प्रबंधक, उच्च न्यायालय, (मूळ शाखा), मुंबई,
* १५. प्रबंधक, उच्च न्यायालय, (अपील शाखा), मुंबई,
* १६. प्रबंधक, महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण, कुटीर क्र.३ व ४, अधिदान व लेखा कार्यालय आवार, मुंबई,
* १७. सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई,
* १८. प्रबंधक, लोक आयुक्त व उप लोक आयुक्त यांचे कार्यालय, मादाम कामा रोड, मुंबई,
* १९. प्रमुख न्यायाधिश, कुटुंब न्यायालय, नागपूर/मुंबई, वांद्रे, मुंबई ४०० ०५१,
२०. उप संचालक, लेखा व कोषागारे, कोकण विभाग,कोकण भवन, नवी मुंबई/पुणे/नागपूर/औरंगाबाद/नाशिक/अमरावती.
२१. उप मुख्य लेखा परीक्षक (वरीष्ठ), स्थानिक निधी लेखा,कोकण विभाग, कोकण भवन, नवी मुंबई/पुणे/नागपूर/औरंगाबाद/नाशिक/अमरावती.
२२. सर्व जिल्हा कोषागार अधिकारी,
२३. सर्व उप कोषागार अधिकारी,
२४. मंत्रालयाच्या सर्व प्रशासकीय विभागांच्या नियंत्रणाखालील सर्व विभाग प्रमुख, प्रादेशिक कार्यालय प्रमुख आणि कार्यालय प्रमुख,
२५. मंत्रालयातील सर्व प्रशासकीय विभाग,
२६. सर्व विभागीय आयुक्त,
२७. सर्व जिल्हाधिकारी
२८. सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी,
२९. सर्व जिल्हा परिषदांचे अर्थ विभागातील मुख्य लेखा व वित्त अधिकारी,
३०. विशेष आयुक्त, महाराष्ट्र सदन, कोपर्निकस रोड, नवी दिल्ली ११० ००१,
३१. संचालक (माहिती), महाराष्ट्र परिचय केंद्र, अ-८, स्टेट एम्पोरिया इमारत, बाबा खरकसिंग मार्ग, नवी दिल्ली ११० ००१,
३२. निवड नस्ती, विनियम, वित्त विभाग.

---

* पत्राने

एच-1094(12500+15-2-00)।अ.